**सन २०२२-२३ मध्ये राज्यातील आदिवासी जिल्ह्यामध्ये आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवडीची योजना राबविण्यास रु. ३३.०० लाख एवढया निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत. (लेखाशिर्ष- २४०१ A८०६)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.आपयो-२०२२/प्र.क्र. ९९/९अे**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- ११ मे, २०२२

**वाचा:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. पफयो २००३/प्र.क्र. ८५/फ-२, दि. १६/११/२००३.
२. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. आपयो २०१८/प्र.क्र. १७३/९अे, दि. ०१/१०/२०१८.
३. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो २२-२३ प्र/२०२२/१४४५८, दि. १२/०४/२०२२.
४. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो/उप्र/२०२२/१६७१०, दि. ०४/०५/२०२२.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दि. ०४/०४/२०२२

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्यातील १४ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने व आदिवासी बांधवांना पौष्टिक आहार पुरविण्यासाठी, आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत पौष्टीक भाजीपाला व फळांची निवड करुन त्याची लागवड करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी **"आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड"** ही योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजना राबविण्याकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. ३३.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रु. ३३.०० लाख निधीचा प्रस्ताव संचालक (फलोत्पादन) यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र. ५ येथील शासन परिपत्रकान्वये कार्यक्रमांतर्गत योजनांसाठी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६०% च्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्यासाठी सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या निधीच्या मर्यादेत म्हणजे रु. ३३.०० लाख एवढया निधीच्या कार्यक्रमाला प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. राज्यातील ठाणे, पालघर, पुणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, अमरावती व गोंदिया या १४ जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु. ३३.०० लाख (रुपये तेहतीस लाख फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमाला प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता संचालक फलोत्पादन यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषी अधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कृपया घोषित करण्यात येत आहे.

३. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपलब्ध निधीच्या मर्यादेत कार्यक्रम राबविण्याची दक्षता घ्यावी.

३. आदिवासी कुटुंबामध्ये कुपोषणाचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर असल्याने विशेष बाब म्हणून उपलब्ध करून दिलेल्या तरतूदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरून शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजनेतील वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हानिहाय लाभार्थ्यांच्या यादीसह सादर करावा.

७. सदर प्रकरणी इतर कार्यवाही उपरोक्त वाचा येथील क्र. २ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करावी.

८. हे आदेश वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दि. ०४/०४/२०२२ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५१११२५९११८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2022.05.11 13:00:58 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, राज भवन, मलबार हिल, मुंबई - ३२
२. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव (कृषी व फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
६. आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे.
९. संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
११. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१३. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१४. अधिदान लेखाधिकारी, मुंबई.
१५. सहायक संचालक (लेखा),आयुक्त (कृषि), यांचे कार्यालय, पुणे.
१६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१७. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई-३२ (प्रसिध्दीसाठी).
१८. कार्यासन क्र.२ व ९ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.कार्यासन ९-अे, निवडनस्ती.